**सन २०१५-२०१६ या शैक्षणिक वर्षापासून माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या नवीन / अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः व्हीओसी-२०१५/प्र.क्र.१०६/व्यशि-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०७ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ :**

१) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ४/व्हिओसी/२२०३/२०१५-१६/४४, दिनांक २७/५/२०१५.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या नवीन शैक्षणिक धोरणानुसार माध्यमिक स्तरावर व्यवसाय शिक्षणाची जोड देऊन विद्यार्थ्यांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण करणे व प्राथमिक कौशल्य विकसित करण्याच्या दृष्टीने खालील तीन बहुकौशल्ययुक्त अभ्यासक्रम १९९६-९७ पासून सुरु करण्यात आले. सदर अभ्यासक्रम राज्यामध्ये शासकीय संस्था, अशासकीय अनुदानित संस्था व अशासकीय विना अनुदानित संस्थेत राबविण्यात येत आहेत.

१. V-१ मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (Introduction to Basic Technology-IBT),
२. V-२ अभियांत्रिकी तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे (Elements of Mechanical Engineering-EME)
३. V-३ विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे ( Elements of Electrical and Electronics Technology-EEET )

४. या अभ्यासक्रमांची वाढती मागणी लक्षात घेऊन शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या नवीन/अधिकच्या तुकड्या **कायम स्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर** सुरु करण्यासाठी व्यवसाय शिक्षण संचालनालयाकडून प्रस्ताव मागविण्यात आले होते. त्यानुसार संस्थांकडून अभ्यासक्रम सुरु करण्याचे प्रस्ताव संचालनालयास प्राप्त झाले होते. संस्थाकडून प्राप्त झालेल्या सदर प्रस्तावांची संचालनालय स्तरावर छाननी करण्यात आली. त्यानुसार संचालनालयाने शासनास शिफारस केलेल्या प्रस्तावामधील विहित निकष/मानकाची पूर्तता करणाऱ्या १५ संस्थांच्या १७ तुकड्यांना माध्यमिक स्तरावरील पूर्वव्यवसायिक अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या १५ संस्थांमध्ये १७ नविन/ अधिकच्या तुकडया ( सदर संस्था खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे आहेत ) कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून सुरू करण्यास खालील अटीं व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे. याचा लाभ माध्यमिक स्तरावरील १०२० विद्यार्थ्यांना होईल.

| विभाग | अ. क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | अभ्यासक्रमाचे नाव | मंजूरी तुकडयांची संख्या (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| मुंबई | जिल्हा : ठाणे. | | | |
| | १ | एस.व्ही.बी. शंकरा विद्यालय, संकारा नगर सोनारपाडा डोंबिवली (पूर्व)जि.ठाणे | इलेक्ट्रिकल आणि इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी (व्ही-३) | १ तुकडी |
| पुणे | जिल्हा : सातारा | | | |
| | २ | रयत शिक्षण संस्थेचे न्यु इंग्लिश स्कूल करंजखोप, ता.कोरेगाव जि.सातारा | बेसिक टेक्नॉलॉजी (व्ही-१) | १ तुकडी |
| | ३ | औंध शिक्षण मंडळ संचलित श्री. यमाई श्रीनिवास विद्यालय, औंध ता.खटाव जि. सातारा | बेसिक टेक्नॉलॉजी (व्ही-१) | १ तुकडी |
| | ४ | कोयना शिक्षण संस्था पाटण द्वारा संचलित सौ. सुलोचनाबाई पाटणकर कन्याशाळा पाटण ता. पाटण जि.सातारा | बेसिक टेक्नॉलॉजी (व्ही-१) | १ तुकडी |
| | ५ | कोयना शिक्षण संस्था पाटण द्वारा संचलित नेताजी सुभाषचंद्र हायस्कूल व कनिष्ठ महाविद्यालय कला वाणिज्य कोयनानगर ता. पाटण जि. सातारा | बेसिक टेक्नॉलॉजी (v१) | १ तुकडी |
| | | जिल्हा : पुणे | | |
| | ६ | कै.उषाताई लोखंडे चॅरिटेबल ट्रस्ट पुणे संचलित माध्यमिक विदयालय सांगिसे टाकवे खु.ता मावळ जि.पुणे . | बेसिक टेक्नॉलॉजी (v१) | १ तुकडी |
| | ७ | रयत शिक्षण संस्थेचे यशवंत माध्यामिक व उच्च माध्यामिक विज्ञान विदयालय) खडकवासला,पुणे. | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी (v ३) | १ तुकडी |
| | ८ | ससाणे एज्युकेशन सोसायटीचे न्यु इंग्लीश स्कूल ससाणे नगर, हडपसर,पुणे . | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी (v ३) | १ तुकडी |
| नाशिक | जि.अहमदनगर | | | |
| | ९ | संजीवनी ग्रामीण शिक्षण संस्थेचे एकलव्य आदिवासी अनुदानित आश्रमशाळा टाकळी ता.कोपरगाव जि.अहमदनगर | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलाजी (v ३) | १ तुकडी |
| | जि. नाशिक | | | |
| | १० | एकता सास्कृतिक , शैक्षणिक व वैद्यकिय सेवा संस्था, कोठूळे ता. सुरगाणा जि. नाशिक | बेसिक टेक्नॉलॉजी (v१) | १ तुकडी |

| विभाग | अ. क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | अभ्यासक्रमाचे नाव | मंजूरी तुकडयांची संख्या (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
|---|---|---|---|---|
| | ११ | राष्ट्रसंत आचार्य आनंद ऋषीजी शिक्षण प्रसारक मंडळ, नाशिक रोड, जि. नाशिक | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलाजी (v ३) | १ तुकडी |
| | १२ | रयत शिक्षण संस्थेचे पुंजाजी रामजी भौर विदयालय व डॉ अण्णासाहेब शिंदे कनिष्ठ महाविदयालय ठाणगाव ता. सिन्नर जि. नाशिक | बेसिक टेक्नॉलॉजी (v१) | १ तुकडी |
| | | **जि. जळगाव** | | |
| | १३ | चोपडा एज्युकेशन सोसायटी संचलित प्रताप विदयामंदीर चोपडा जि. जळगाव | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलाजी (v ३) | १ तुकडी |
| | १४ | विवेकानंद प्रतिष्ठान जळगाव संचलित कै श्रीमती ब.गो. शानभाग विदयालय सावरखेडा बु. ता. जि. जळगाव. | मेकनिकल टेक्नॉलॉजी (v २) | १ तुकडी |
| | | | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलाजी (v ३) | १ तुकडी |
| | १५ | खांदेश कॉलेज एज्युकेशन सोसायटी जळगाव संचलित ऐ.टी.झांबरे माध्यमिक महाविदयालय, जळगाव | मेकनिकल टेक्नॉलॉजी (v २) | १ तुकडी |
| | | | इलेक्ट्रिकल ॲन्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलाजी (v ३) | १ तुकडी |
| | | **एकूण संस्था- १५** | **एकूण तुकड्या-१७** | |

अटी व शर्ती

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहितेमध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यांस **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.

५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम"** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन तात्काळ अभ्यासक्रम सुरु करावेत.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्यामुळे या अभ्यासक्रमा करीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा /वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/ समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या नविन /अधिकच्या तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ६० असून, शैक्षणिक वर्ष २०१५-२०१६ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर **अभ्यासक्रमाची** तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नविन अटी व शर्ती अंर्तभूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

**१४. पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या मान्यताप्राप्त संस्थामध्ये विद्यार्थी प्रवेशापुर्वी संचालकांकडुन स्थानिक स्थायी समिती नेमुन निरीक्षण करण्यात यावे. तसेच व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या परवानगीने प्रवेश देण्याच्या अटीवरच पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमास परवानगी देण्यात येत आहे.**

१५. व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत मंजूर व्यवसाय अभ्यासक्रमाच्या मंजूर तुकडीनुसार प्रवेश क्षमतेपेक्षा अतिरिक्त अनधिकृत प्रवेश केल्यास शासनाने सन २०१३ या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २० राजपत्र दि. २१/८/२०१३ अन्वये प्रसिध्द झालेल्या अधिनियमान्वये अनधिकृत संस्था स्थापन करण्यास अथवा अनधिकृत पाठ्यक्रम सुरू करण्यास मनाई करण्यात आली आहे.

शैक्षणिक वर्ष २०१५-१६ मध्ये मान्यता दिलेल्या उपरोक्त तक्त्यातील किती संस्थांनी व्यवसाय अभ्यासक्रम सुरु केले. अभ्यासक्रम निहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण यांनी शासनास दि.३१/१०/२०१५ पर्यंत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७१६३६०५४४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajaram Gobaraji Jadhav

Digitally signed by Rajaram Gobaraji Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajaram Gobaraji Jadhav
Date: 2015.08.10 16:23:33 +05'30'

**( रा. गो. जाधव )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
३) विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग)
(यांचेकडे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत)
४) सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई.
(व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)
५) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)
६) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत. त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे.)
७) मा. मंत्री ( उ व तं शि) यांचे खाजगी सचिव
८) मा. राज्यमंत्री (उ व तं शि) यांचे खाजगी सचिव
९) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१०) मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक.
११) सह सचिव (व्यशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक.
१२) निवड नस्ती (व्यशि-४)